**शासकीय कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय/संस्था आणि शासकीय अध्यापक महाविद्यालये यामधील सहाय्यक प्राध्यापक यांची कॅस योजनेंतर्गत सहयोगी प्राध्यापक पदावर AGP ८००० ते AGP ९००० (AL१२ ते AL१३A) मध्ये स्थाननिश्चिती करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण-२०२१/प्र.क्र.३०८/मशि १**
मादामा कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनाक : २५ फेब्रुवारी, २०२२

वाचा :-
१. शासन निर्णय उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. एनजीसी १२८६/(१२२४) विशि-४, दि. २७.०२.१९८९.
२. शासन निर्णय उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. एनजीसी १२०२/ (१६६/२००२) विशि-४, दि. ०३.०४.२००३.
३. विद्यापीठ अनुदान आयोगाची अधिसूचना क्र. एफ ३.१/२००९ दि. ३०.०६.२०१०
४. शासन निर्णय उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. संकीर्ण २०११ (२५/११) विशि-१, दि. १५.०२.२०११
५. विद्यापीठ अनुदान आयोगाचे पत्र क्र. एफ नं. १-७/२०१५ यु.II (१), दि. ०८.११.२०१७.
६. केंद्र शासन, मानव संसाधन विकास मंत्रालय यांचे पत्र क्र. १-७/२०१५-यु.II, दि(१), दि. ०२.११.२०१७.
७. विद्यापीठ अनुदान आयोगाची अधिसूचना क्र. एफ १-२/२०१७(EC/PS), दि. १८.०७.२०१८.
८. केंद्र शासन, मानव संसाधन विकास मंत्रालय यांचे पत्र क्र. १-४/२०१७-यु.II, दि. २८.०१.२०१९
९. शासन निर्णय उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. संकीर्ण-२०१८/प्र.क्र.५६/विशि-१, दि. ०८.०३.२०१९ व दिनांक १०.०५.२०१९.
१०. संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचे पत्र क्र. उशिसं-२०२१/कॅस/प्रशा-१/१३८३६, दि. ०१.१२.२०२१.
११. शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण-२०२१/प्र.क्र.३०८/मशि १, दिनांक २०.१२.२०२१.

**शासन निर्णय :-**

शासकीय महाविद्यालये/विज्ञान संस्था/अध्यापक महविद्यालये यामधील सहाय्यक प्राध्यापक यांना विद्यापीठ अनुदान आयोगाने अधिसूचना क्र. एफ ३.१/२००९ दि. ३०.०६.२०१० अन्वये निकष विहित करून सेवांतर्गत प्रगती योजना (Career Advancement Scheme) लागू केली आहे. सदर अधिसुचनेतील तरतूदी राज्यात शासन निर्णय क्र. संकीर्ण २०११ (२५/११) विशि-१, दि. १५.०२.२०११ अन्वये लागू करण्यात आल्या आहेत. केंद्र शासनाच्या मानव संसाधन विकास मंत्रालयाने संदर्भाधिन क्र.६ येथील दि. ०२.११.२०१७ च्या पत्रान्वये विद्यापीठ तसेच

महाविद्यालयातील शिक्षकीय पदांची वेतनश्रेणी ७ च्या वेतन आयोगानुसार सुधारित करणेबाबत सूचित केले आहे. विद्यापीठ अनुदान आयोगाने दि. १८.०७.२०१८ च्या अधिसूचनेन्वये सेवांतर्गत प्रगती योजना (Career Advancement Scheme) लागू केली आहे. त्यानुसार राज्यातील शासकीय कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय/ संस्था आणि शासकीय अध्यापक महाविद्यालये यामधील अध्यापकांना ७ व्या वेतन आयोगातील तरतुदी संदर्भाधिन क्र. ९ येथील दि.०८.०३.२०१९ व दिनांक १०.०५.२०१९ च्या शासन निर्णयान्वये लागू करण्यात आलेल्या आहेत.

राज्यातील शासकीय कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय/संस्था आणि शासकीय अध्यापक महाविद्यालये यामधील अध्यापकांना सेवांतर्गत प्रगती योजने अंतर्गत सहयोगी प्राध्यापक पदावर स्थाननिश्चिती करण्यासाठी शासन निर्णय क्र. एससीपी -२०२१/ प्र.क्र.२१/मशि-१, दि. ०७.०६.२०२१ अन्वये निवड समिती गठीत करण्यात आली आहे. सदर समितीच्या दि. २४.११.२०२१ ते २९.११.२०२१ या कालावधीतील बैठकीत समितीने केलेल्या शिफारसी विचारात घेवून, संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भाधिन क्र. १० येथिल पत्रान्वये शासकीय कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय/ संस्था आणि शासकीय अध्यापक महाविद्यालये यामधील सहाय्यक प्राध्यापक यांची सहयोगी प्राध्यापक पदावर AGP ८००० ते AGP ९००० (AL१२ ते AL१३A) मध्ये स्थाननिश्चिती करण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला होता. सदर प्रस्तावानुसार निवड समितीने शिफारस केलेल्या अध्यापकांना संदर्भाधिन क्र. ११ येथिल दि. २०.१२.२०२१ च्या शासन निर्णयान्वये सहयोगी प्राध्यापक या पदावर स्थानिश्चिती करण्यात आली आहे.

३. डॉ. श्रीनाग पंचभाई, सहाय्यक प्राध्यापक, शासकीय विधी महाविद्यालय, मुंबई यांच्याविरुध्द विभागीय चौकशी सुरु असल्याने, त्यांचा सहयोगी प्राध्यापक पदावरील (AGP ८००० ते AGP ९०००) स्थान निश्चितीबाबत समितीने दिलेला निर्णय मोहोरबंद पाकीटात ठेवण्यात आला होता. डॉ. पंचभाई यांना दिनांक १८.२.२०२२ च्या आदेशान्वये विभागीय चौकशी प्रकरणातून दोषमुक्त करण्यात आले आहे. त्यामुळे निवड समितीच्या निर्णयाचे मोहोरबंद पाकीट दिनांक २३.०२.२०२२ रोजी उघडण्यात आले. निवड समितीने केलेल्या शिफारशीनुसार डॉ. पंचभाई, सहाय्यक प्राध्यापक यांना त्यांच्या नावासमोर दर्शविण्यात आलेल्या दिनांकापासून सेवांतर्गत प्रगती योजनेतंर्गत (Career Advancement Scheme) स्थान निश्चिती करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे :-

| **सहाय्यक प्राध्यापकाचे नाव** | **विषय** | **महाविद्यालयाचे नाव** | **सहयोगी प्राध्यापक पदावर (AGP ८००० ते AGP ९००० ( AL१२ ते AL१३A) स्थाननिश्चितीचा दिनांक** |
|---|---|---|---|
| डॉ. श्रीनाग अरुण पंचभाई | विधी | शासकीय विधी महाविद्यालय, मुंबई | दि.२०/०२/२०१८ |

४. डॉ. श्रीनाग पंचभाई यांची वेतननिश्चिती करण्याची कार्यवाही संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे हे करतील.

५. यासाठी येणारा खर्च, शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग ,क्र. संकीर्ण- २०१८/ प्र.क्र.५६/विशि-१, दि. ०८.०३.२०१९ मध्ये दर्शविलेल्या संबंधित अर्थसंकल्पीय लेखाशिर्षाखाली खर्ची दर्शविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२२५१५२७२७२४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Hariram V Parhate

Digitally signed by Hariram V Parhate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8bfd656b321bf6c348564562d46cd2934b62b770484625206559a2c204e56cb8, serialNumber=d01f16685aedf1abc9cfd58347280b4c4cb8d304afd1d413884ef4d91aa1462d, cn=Hariram V Parhate
Date: 2022.02.25 15:37:36 +05'30'

**( ह. व्यं. पऱ्हाते )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
४. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. सर्व प्राचार्य/संचालक, शासकीय महाविद्यालये/संस्था.
७. सर्व प्राचार्य, शासकीय अध्यापक महाविद्यालये.
८. डॉ. श्रीनाग पंचभाई, सहाय्यक प्राध्यापक यांना प्राचार्य, शासकीय विधी महाविद्यालय, मुंबई यांच्यामार्फत
९. निवडनस्ती/मशि-१.